मौजे कापशी रोड (ता. जि. अकोला ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. सुप्रमा - १९१५/प्र.क्र. २४८ /पापु १३**

**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मुंबई-४०० ०३२**

**तारीखः २७ डिसेंबर, २०१६**

**वाचा -**

१) अधीक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती यांचे क्र.भनिक/अम/तांशा/तां.मं/२५२/२०१४, दिनांक ०७/०७/२०१४

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांचे आदेश क्र.जिपअ/ग्रापापुवि/तांशा-१/१९६२/२०१४, दि. १३/०८/२०१४.

३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला यांची तांत्रिक मंजूरी क्र.७, जुलै, २०१५.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांचे पत्र क्र.जिपअ/ग्रापापुवि/तांशा-१/२२१४/२०१६, दिनांक २१/०८/२०१५.

५) शासन निर्णय ग्रापाधो-१११९/प्र.क्र.१३४/पापु-०७,दि.२०/०२/२०१५.

६) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७,दि.१५/०६/२०१५ व दि.१४ मार्च, २०१६.

**प्रस्तावना**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे कापशी रोड (ता.जि.अकोला) नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.५२,५१,३७८(निव्वळ) व रु.५८,७४,००२/-(ढोबळ)** किंमतीस अधीक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये तांत्रिक मान्यता दिली होती. त्यास अनुसरुन मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला क्र.२ येथील आदेशान्वये योजनेच्या **रु.५८,७४,००२/- (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी अपरिहार्य कारणांमुळे प्रस्तुत योजनेच्या कामात वाढ झाल्याने योजनेच्या किंमतीत वाढ झाली असल्याने कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला संदर्भ क्र.३ अन्वये प्रस्तुत योजनेच्या रुपये ८६,५६,९०५/- (ढोबळ) किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिली आहे. परिणामी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव

संदर्भाधिन पत्र क्र.४ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मौजे कापशी रोड (ता.जि.अकोला) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये **८६,५६,९०५/- (ढोबळ) (अक्षरी रुपये शहाऐंशी लक्ष छप्पन्न हजार नऊशे पाच फक्त)** एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

### अटी

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत योजनेची उर्वरित कामे ६ महिन्यात पूर्ण करण्यात यावीत. प्रस्तुत योजनेच्या खर्चात वाढ होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. तसेच योजनेची कामे पूर्ण करुन योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, अकोला संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर फी नियम १९६० मधील तरतुदीनुसार आकारण्यात येणाऱ्या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वयंनिर्भर होईल याची जबाबदारी जिल्हा परिषद, अकोला व कापशी रोड ग्रामपंचायत यांची राहील. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वेळोवेळी वाढ करणे बंधनकारक राहील.

५. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

६. योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांची राहिल.

७. सदर योजना पूर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने (संबधित ग्राम पंचायत/जिल्हा परिषद ) योजना हस्तांतरीत करुन घेणे बंधनकारक राहील.

८. योजनेचे सर्वेक्षण करतांना संभाव्य अडचणींचा विचार करण्यात आल्याचे दिसत नाही.त्यामुळे योजनेची किंमत अवास्तव वाढल्याचे दिसते तरी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे स्तरावर सदोष सर्वेक्षण करण्यास जबाबदार संबधितांवर जबाबदारी निश्चित करण्याची कार्यवाही करुन त्यांच्यावर आवश्यक ती कारवाई करण्यात यावी.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. २७,८२,९०३/- (अक्षरी रुपये सत्तावीस लक्ष ब्याऐंशी हजार नऊशे तीन फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून/किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होण्याऱ्या निधीतून करण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६/१४४३, दिनांक १२/०५/२०१६ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ३११/व्यय-३,दि.०९/१२/२०१६ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२७१६५२०३२३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2016.12.27 17:02:20 +05'30'

**( सु.दे.आंबेकर )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, अकोला.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला.

६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
९) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, अमरावती.
१०) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अकोला.
११) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१२) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला.
१४) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
१४) कक्ष अधिकारी (कार्या-१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१७,१८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१५) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.